# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

---

### अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### मौजे कल्याण व मौजे वाडेघर येथील भूखंडाच्या संदर्भात पुनर्विलोकन आदेशत खोट्या नावाचा वापर केल्याबाबत

**(१) ६८५३ (०६-०८-२०१५). श्री.जगन्नाथ शिंदे, अॅड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले, अॅड.निरंजन डावखरे, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे कल्याण सर्व्हे क्रमांक ३८ व ४० आणि मौजे वाडेघर सर्व्हे क्रमांक ५९/६, ६०/२, ७८ व ७९ या भूखंडाच्या संदर्भात ना.ज.क.था. अधिनियम, १९७६ च्या कलम ३४ अन्वये पुनर्विलोकन आदेश प्राप्त करुन घेतेवेळी दाखल केलेल्या खोट्या व अस्तित्वात नसलेल्या (नॉन अजेस्टिंग) नावांचा वापर करुन त्याच नावांच्या आधारे प्राप्त करुन घेतलेल्या कुलमुखत्यारपत्राच्या आधारे हितसंबंधित व्यक्तींनी कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेकडून उपरोक्त भूखंडावर बांधकाम परवानगी प्राप्त करुन घेवून बांधकाम भाग पूर्ततेचा दाखला प्राप्त करुन घेताना झालेल्या गैरव्यवहाराच्यासंदर्भात सखोल चौकशी करुन मंजूरीमध्ये समाविष्ट असलेले सर्व बांधकाम अनधिकृत घोषित करुन ते निष्कासित करण्यात यावेत तसेच या गैरव्यवहारास जबाबदार असलेल्या सर्व संबंधितांविरोधात फौजदारी गुन्हे दाखल करुन त्यांचेविरुध्द कडक कायदेशीर कारवाई करण्यात यावी, अशा

आशयाच्या मागणीचे एक निवेदन श्री.श्रीनिवास अनंत घाणेकर व श्री.अंजूम रोझोद्दिन खान यांनी प्रधान सचिव, नगरविकास विभाग, संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य नगररचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, मुख्यालय, पुणे, आयुक्त कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, पोलीस उपायुक्त, परिमंडळ-३, कल्याण, सहायक पोलीस आयुक्त तसेच मा.मुख्यमंत्री इत्यादींकडे दिनांक २३ फेब्रुवारी, २०१३, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१५ व तद्नंतर आजमितीस सातत्याने लेखी निवेदनाद्वारे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या संपूर्ण प्रकरणाची सखोल चौकशी करण्यात आली आहे काय,

(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कारवाई करण्यात आली आहे,

(४) अद्यापी चौकशी होवून संबंधित दोषीविरोधात कारवाई करण्यात आली नसल्यास, त्याची सर्वसाधारण कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०८-२०१८) :** (१) होय.

(२), (३) व (४) सदर प्रकरणी शासनाने आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांना दिनांक २१/११/२०१५ च्या पत्रान्वये खालीलप्रमाणे कळविले आहे.

१) सदर प्रकरणातील कागदपत्रांची वैधता व सत्यता कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने तपासावी व देण्यात आलेली बांधकाम परवानगी व टिडीआर बनावट कागदपत्रांवर असल्याचे आढळल्यास विकास नियंत्रण नियमावली क्र. ३१ अन्वये बांधकाम परवानगी व टिडीआर रद्द करावा व संबधितांवर गुन्हे दाखल करावेत.

२) बनावट कागदपत्रांचे आधारे बांधकाम परवानगी व टिडीआर दिला असल्यास त्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

३) बनावट कागदपत्राचे आधारे देण्यात आलेला टिडीआर हा संबधितानी विकला असल्यास व त्यामुळे Third Party Interest निर्माण झाला असल्यास त्याबाबत माहिती प्राप्त करून सदर बनावट टिडीआर रद्द करावा व त्याबाबतची नुकसान भरपाई संबंधित Third Party ने ज्यांच्याकडून बनावट टिडीआर घेतला त्याचेकडून वसुल करणे आवश्यक राहील तसेच सदर बनावट टिडीआरद्वारे Third Party ने केलेले

बांधकाम अनधिकृत ठरत असल्याने त्याबाबत योग्य ती कार्यवाही करावी.

शासनाच्या उक्त पत्रानंतर कल्याण-डोंबिवली महानगपालिकेने बांधकाम परवानगी रद्द केली असून, सदर बांधकाम परवानगी रद्द करण्याच्या आदेशाविरुध्द संबंधित विकासकाने मा.उच्च न्यायालयात रिट यचिका क्र. ८३५८/२०१६ दाखल केली असून, सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

---

## मुंबईसह कोकणामध्ये वाढलेल्या गुन्हेगारीबाबत

**(२) ९६२८ (०६-०८-२०१५). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले, श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईसह कोकणामध्ये ठिकठिकाणी अनेक घरफोड्या व दरोड्याच्या घटना माहे, जानेवारी ते मे, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान घडल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,

(३) असल्यास, चौकशीच्या अनुषंगाने आतापर्यंत किती दरोडेखोरांना अटक केली आहे, तसेच त्यांचेवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०८-२०१८) :** (१), (२) व (३) मुंबईसह कोकण विभागामध्ये घरफोडी व दरोडा या सदराखालील माहे जानेवारी ते मे, २०१५ या कालावधीतील नोंद गुन्ह्याची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| घटकाचे नाव | घरफोडी | | | दरोडा | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | दाखल गुन्हे | उघड गुन्हे | अटक आरोपी | दाखल गुन्हे | उघड गुन्हे | अटक आरोपी |
| **मुंबई** | १२५१ | ६१० | ९४३ | ११ | ११ | ७० |
| **ठाणे शहर** | ६९३ | १४८ | २२५ | २१ | १५ | ५१ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **ठाणे ग्रामीण** | १२१ | ३७ | ३७ | ४ | ४ | १२ |
| **नवी मुंबई** | २१३ | १२० | २५५ | ६ | ६ | ३४ |
| **पालघर** | २४८ | ५९ | १३३ | ६ | ५ | १६ |
| **रायगड** | ६९ | १६ | ४५ | - | - | - |
| **रत्नागिरी** | ५१ | १४ | ३२ | ४ | ४ | १२ |
| **सिंधुदुर्ग** | २९ | ११ | १२ | - | - | - |

वरील प्रकरणी वेळीच योग्य ती कायदेशीर कारवाई करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे माणी (ता.खेड, जि.रत्नागिरी) येथे महाराष्ट्र राज्य विद्‌युत वितरण कंपनीकडून शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याबाबत

**(३) १९२६६ (२७-०४-२०१६). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार : तारांकित प्रश्न क्रमांक १००२८ ला दिनांक १६ जुलै, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे माणी (ता.खेड, जि.रत्नागिरी) येथील गट नं. ४३०, ४९८, ६९४ व ५०५ मधील शेती व बागायतीमध्ये दिनांक १ एप्रिल, २०११ रोजी वा त्यासुमारास महाराष्ट्र राज्य विद्‌युत वितरण कंपनीच्या विद्‌युत खांबावरील तारा तुटून लाखो रुपयाचे नुकसान होवूनही शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यात आलेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांच्या निर्देशानुसार उपविभागीय अधिकारी (प्रांत) खेड यांचेकडून सदरील जळीत प्रकरणाच्या नुकसान भरपाईबाबत आवश्यक असणारे मुल्यांकन माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान महावितरण कंपनी प्राप्त झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदरहू घटनेस ५ वर्षाचा कालावधी होवूनही अद्यापही महाराष्ट्र राज्य विद्‌युत वितरण कंपनी गरिब शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यास करण्यात येणाऱ्या कागदपत्रांच्या प्रतिपूर्तीबाबत तसेच तात्काळ नुकसान भरपाई

अदा करण्यासाठी कोणत्या कार्यवाहीची आवश्यकता आहे, याबाबत कोणतीही परिपूर्ण माहिती महावितरण कंपनीकडून देण्यात येत नसून नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यास महावितरण कंपनीकडून जाणूनबुजून विलंब करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) व (४) शेतकऱ्यांच्या नुकसान भरपाई मुल्यांकनासाठी दिनांक २२/८/२०१६ रोजी उपविभागीय अधिकारी, खेड यांनी तालुका कृषी अधिकारी व महावितरणचे प्रतिनिधी यांच्यासोबत संयुक्त सुनावणी घेतली. उपविभागीय अधिकारी खेड यांनी कृषी विभागास "शासनाने ठरवून दिलेल्या मापदंडानुसार हेक्टरी अनुज्ञेय अनुदानाची गणना करावी व महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (MREGS) अंतर्गत मापदंडानुसार जळीत फळझाडांचे मुल्यांकन करुन अहवाल सादर करावा" असे आदेश दिले आहेत. कृषी विभागाकडून जळीत फळझाडांचे मुल्यांकन अहवाल महावितरण कंपनीस दिनांक ७/८/२०१८ रोजी प्राप्त झाला. त्यानुसार सदर अहवाल मंजुरीकरीता महावितरण कंपनीच्या वरिष्ठ कार्यालयास पाठविण्यात आला आहे.

---

## परभणी जिल्ह्यातील शासकीय, निमशासकीय कार्यालयात बायोमॅट्रिक प्रणाली राबविणेबाबत

**(४) १९९३२ (२३-०८-२०१६). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी : तारांकित प्रश्न क्रमांक ११७९४ ला दिनांक २३ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्ह्यातील सर्व शासकीय, निमशासकीय कार्यालयांसह महामंडळ व इतर शासन अधिपत्याखालील असणाऱ्या कार्यालयांमध्ये बायोमॅट्रीक

उपस्थिती नोंदवावी असे आदेश जिल्हाधिकारी, परभणी यांनी सन २०१५ मध्ये वा त्यादरम्यान सर्व विभाग प्रमुखांना दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जिल्हाधिकाऱ्यांच्या आदेशास न मानता बहुतांशी कार्यालयांनी अद्याप बायोमॅट्रीक प्रणाली शिवाय उपस्थिती नोंदवणे व वेतन काढणे असे प्रकार सुरू ठेवले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, जिल्हयातील एकुण कार्यालयांपैकी किती कार्यालयांनी जिल्हाधिकारी यांचे आदेशाप्रमाणे प्रत्यक्षात सदरील प्रणाली राबविलेली आहे,
(४) तसेच, जिल्हाधिकारी यांचे आदेशाचे पालन न करणाऱ्या विभाग प्रमुखांविरूध्द शासनाने चौकशी करुन कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-०८-२०१८) :** (१) होय. हे खरे आहे, सदरचे पत्र दिनांक ५/५/२०१४ रोजी परभणी जिल्हयातील सर्व विभाग प्रमुखांना देण्यात आलेले आहे.
(२) हे खरे नाही.
(३) प्रश्नच उद्भवत नाही.
(४) प्रश्नच उद्भवत नाही.
(५) प्रश्नच उद्भवत नाही.

---

## ठाणे जिल्हयातील अनधिकृत मोबाईल टॉवरवाल्यांकडे करोडो रुपयांची थकबाकी असल्याबाबत

**(५) २००९३ (२३-०८-२०११). श्री.हेमंत टकले, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे जिल्हयातील २१६९ पैकी मोबाईल टॉवर अनधिकृत असल्याचे व ह्या टॉवरवाल्यांकडे ५ कोटी ६९ लाखांची थकबाकी असल्याचे माहितीच्या अधिकाराव्दारे मार्च, २०११ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,
(२) राज्यातील बहुतांशी जिल्हयांमध्ये अनधिकृत मोबाईल टॉवर आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी करण्यात आली आहे काय,
(४) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**देवेंद्र फडणवीस (०१-०८-२०१८) :** (१) ठाणे तालुक्यामध्ये १५२६, कल्याण तालुक्यामध्ये २६६, मुरबाड तालुक्यामध्ये ३९, भिवंडी तालुक्यामध्ये १६३, शहापूर तालुक्यामध्ये १०५ व अंबरनाथ तालुक्यामध्ये ६६ असे एकूण २२२५ मोबाईल टॉवर्स असल्याचे तहसिलदार, ठाणे यांनी त्यांच्या अहवालात नमुद केले आहे.

सदर अनधिकृत मोबाईल टॉवर्सबाबत दंडनिय रक्कम वसुल करण्याची कार्यवाही सुरु असल्याचे जिल्हाधिकारी, ठाणे यांनी कळविले आहे.
(२) व (३) तहसिलदार यांचे अहवालानुसार ठाणे जिल्ह्यांमध्ये २२२५ अनधिकृत मोबाईल टॉवर्स असल्याचे आढळून आले आहेत.
(४) उपरोक्त प्रकरणी अनधिकृत मोबाईल टॉवर्सवर खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात येत आहे :-

- ठाणे जिल्ह्यातील उक्त नमुद अनधिकृत मोबाईल टॉवर्सबाबत संबंधितांकडून नियमानुसार दंडनिय रक्कम वसूल करण्याची कार्यवाही सुरु आहे.
- मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल ५३६०-५३६३/२०१३ अंतर्गत दिलेल्या निर्णयानुसार सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मोबाईल टॉवर उभारण्यात आलेल्या ठिकाणी (मोकळ्या जागा अथवा टेरेस/अस्तित्वातील इमारतींमधील मोकळ्या जागा) मुंबई महानगरपालिका अधिनियम,१९४९ तसेच महाराष्ट्र नगरपरिषद, नगर पंचायत व औद्योगिक नागरी अधिनियम, १९६५ व तत्सम अधिनियमातील मालमत्ता कर लागू करण्याच्या तरतुदीनुसार मालमत्ता कर आकारण्याकरीता दिनांक १६/०५/२०१७ च्या परिपत्रकान्वये सूचित करण्यात आले आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील सामाजिक न्याय विभागाकडून गुणवंत विद्यार्थ्यांना परदेशात पाठविण्याबाबत

**(६) २०११० (१६-०८-२०१६). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुसूचित जातीच्या प्रवर्गातील गुणवंत विद्यार्थ्यांना फक्त पदव्युत्तर उच्च शिक्षणासाठी परदेशात पाठविले जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पदवी, पदव्युत्तर व व्यावसायिक उच्च शिक्षण तसेच हवाई जहाज पायलट ट्रेनिंगसाठी सामाजिक न्याय विभागाकडून गुणवंत विद्यार्थ्यांना परदेशात न पाठविण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, ४०० ऐवजी ४००० विद्यार्थ्यांना पदरेशात पाठविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे काय, यासाठी सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात पुरवणी मागण्यांमध्ये निधीची उपलब्धता करुन देणार आहे काय ?

**श्री.राजकुमार बडोले (१०-१०-२०१८) :** (१) व (२) अनुसूचित जातीतील ज्या विद्यार्थ्यांना Q.S. World Ranking १ ते ३०० असलेल्या विद्यापीठामध्ये प्रवेश मिळालेला आहे. अशा विद्यार्थ्यांना पदव्युत्तर पदवी व पीएचडी या अभ्यासक्रमासाठी परदेश शिष्यवृत्ती योजनेंतर्गत विज्ञान, अभियांत्रिकी, वैद्यकीय, व्यवस्थापन तसेच कला व वाणिज्य या विषयाच्या अभ्यासक्रमासाठी शिष्यवृत्ती दिली जाते.

(३) नाही.

---

## उल्हासनगर (जि.ठाणे) येथे मुस्लीम समाजाच्या लोकांसाठी कब्रस्थानासाठी जागा देण्याबाबत

**(७) २०९५४ (२३-०८-२०११). श्री.अरुणकाका जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उल्हासनगर (जि.ठाणे) येथे मुस्लीम समाजाच्या लोकांसाठी स.नं. ५८ मध्ये दोन एकर जागा कब्रस्थान वापरासाठी दिनांक २५ जुलै, २००६ रोजी अध्यादेशाव्दारे आरक्षित करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उल्हासनगर महानगरपालिकेने सदर जागेचा ताबा घेतला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर जागेवर रिजेन्सी निर्मल या बिल्डरने अनधिकृत ताबा घेतला आहे, हे खरे आहे काय व स.नं. ५८ मधील २ एकर जमीन कब्रस्थानासाठी ताब्यात देणेबाबत शासन कोणती कार्यवाही करणार आहे ?

**देवेंद्र फडणवीस (१४-०८-२०१८) :** (१) उल्हासनगर शहराच्या सन १९७४ च्या मंजूर विकास योजनेमध्ये महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३७ अन्वये फेरबदल करुन मौ.म्हारळ येथील स.नं. ५८ मधील २ एकर जमीन दिनांक २५/७/२००६ च्या अधिसूचनेन्वये कब्रस्तानाकरीता आरक्षित करण्यात आले आहे.
(२) उल्हासनगर महानगरपालिकेच्या मालमत्ता विभागामार्फत सदर जमिनीचा ताबा दिनांक २७/०१/२०१५ रोजी घेण्यात आला आहे.
(३) नाही. सदर जमिनीचा ताबा यापुर्वीच महानगरपालिकेने घेतलेला असल्याने, प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील मागासवर्गीय विद्यार्थ्यांना दिल्या जाणाऱ्या शिष्यवृत्ती प्रक्रियेत बदल करण्याबाबत

**(८) २१८७८ (१९-०८-२०१६). श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील मागासवर्गीय विद्यार्थ्यांना दिल्या जाणाऱ्या शिष्यवृत्ती प्रक्रियेमध्ये बदल करण्याची मागणी मा.मुख्यमंत्री, मा.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य मंत्री यांचेकडे महाराष्ट्र नवनिर्माण विद्यार्थी सेनेचे अध्यक्ष यांनी माहे एप्रिल, २०१६ च्या शेवटच्या सप्ताहात केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त मागणीच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१०-१०-२०१८) :** (१) होय.
(२) मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती व शैक्षणिक शुल्क प्रतिप्रर्ती योजनेच्या कार्यपध्दती तसेच मार्गदर्शक सूचनेमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जुनी अथवा नवीन अंशदायी योजना लागू नसलेल्या पण सेवेतच मृत्यू झालेल्या शिक्षक, शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना भविष्य निर्वाह निधी व सेवानिवृत्ती वेतन मिळण्याबाबत

**(९) २२५१८ (२३-०८-२०१६). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे : तारांकित प्रश्न क्रमांक १५१२० ला दिनांक १५ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) जुनी अथवा नवीन अंशदायी पेन्शन योजना लागू नसलेल्या पण सेवेतच मृत्यू झालेल्या शिक्षक, शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना भविष्य निर्वाह निधी किंवा कोणतेही सेवानिवृत्ती वेतन मिळालेले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर कुटुंबातील व्यक्तीच्या भविष्यासाठी मदत म्हणून शासनाकडून कोणत्या प्रकारची कार्यवाही करण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१०-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) याबाबत वित्त विभागामार्फत धोरणात्मक निर्णय घेण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील पोलीस व महसूल विभागातील लाच स्वीकारणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांचेवर कारवाई करणेबाबत

**(१०) २७२६९ (१४-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, अॅड.निरंजन डावखरे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात गत वर्षभरात ३०० पोलिसांना लाच स्वीकारताना अटक करण्यात आले तर महसूल विभागातील २७८ जणांना पकडण्यात आल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर लाच स्वीकारणाऱ्या पोलीस व महसूल विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) तसेच, भविष्यात लाच घेण्याचे प्रमाण कमी व्हावे म्हणून शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०८-२०१८) :** (१) गत वर्षात सन २०१७ मध्ये २२१ पोलिसांना लाच स्वीकारताना अटक करण्यात आले, तर महसूल विभागातील २८९ जणांना लाच स्वीकारताना अटक करण्यात आले.

(२) लाच स्वीकारणाऱ्या पोलीस व महसूल विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचेवर महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) व भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम १९८८, मधील तरतुदीनुसार आवश्यक कारवाई करण्यात आलेली आहे.

(३) लाचलुचपत प्रतिबंधक विभागामार्फत मोबाईल अॅप, टोल फ्री. क्र. १०६४, ही हेल्पलाईन, ९९३०९९७७०० हा What Sapp नंबर तसेच Facebook page प्रसिध्दकरून जनजागृती करण्यात येते. लाचलुचपत प्रतिबंधक विभागाच्या संकेतस्थळावरून सामान्य जनतेसाठी सर्व माहिती उपलब्ध केली जात आहे. लाचलुचपत प्रतिबंधक विभागाचे अधिकारी त्यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय कार्यालयात जावून भेटी देवून माहिती देत असतात व त्यांच्या कार्यक्षेत्रातील

आठवडे बाजार, एसटी स्टॅण्ड, रेल्वे स्टेशन, कॉलेज इत्यादी ठिकाणी जाऊन सुध्दा जनजागृती करत असतात. तसेच शासकिय कार्यालयाच्या दर्शनी भागावर लाचलुचपत प्रतिबंधक विभागाबाबत माहिती प्रसिध्द केली जाते.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## स्व.तुळजाबाई करंडे माध्यमिक विद्‌यालय दोन (ता.कारंजा, जि.वाशिम) यांना शाळा स्थलांतरण मान्यता मिळण्याबाबत

**(११) २७५७० (२७-०४-२०१२). श्री.नागो गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) समर्थ रघुवीर बहुउद्देशीय शिक्षण संस्था, दोनदा बु. (ता.कारंजा, जि.वाशिम) संचलित स्व.तुळजाबाई करंडे माध्यमिक विद्‌यालय दोन यांना शाळा स्थलांतरणास मान्यता मिळण्याबाबतचे निवेदन दिनांक २५ जुलै, २०११ रोजी मा.शालेय शिक्षण मंत्री यांना लोकप्रतिनिधींनी दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त निवेदनानुसार मान्यता मिळाली आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**विनोद तावडे (१२-१०-२०१८) :** (१) व (२) स्व. तुळजाबाई करंडे माध्यमिक शाळेच्या स्थलांतरणास मान्यता मिळण्याबाबत मा.शालेय शिक्षण मंत्री यांना लोकप्रतिनिधींनी निवेदन दिल्याचे आढळून येत नाही. तथापि समर्थ रघुवीर बहुउद्देशीय शिक्षण संस्था, दोनदा बु. ता.कारंजा, जि.वाशिम संचलित स्व.तुळजाबाई करंडे माध्यमिक शाळेच्या स्थलांतरास दिनांक ०८ ऑगस्ट, २०१२ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे पिंपळनेर (जि.बीड) येथील शेतकऱ्यांकडून रोहित्र, विद्युत तारा व इतर साहित्य जादा रक्कम घेण्यात येत असल्याबाबत

**(१२) २९३२७ (२७-०४-२०१२). श्री.विक्रम काळे, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे पिंपळनेर (जि.बीड) येथील शेतकऱ्यांकडून रोहित्र, विद्युत तारा व इतर साहित्य घेण्यासाठी जास्तीची रक्कम विद्युत मंडळाकडून घेण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,

(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार शेतकऱ्यांकडून जास्तीची घेण्यात आलेली रक्कम परत देणेबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१०-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माहिती अधिकार कार्यकर्ते आणि सामाजिक कार्यकर्ते यांना पोलीस सुरक्षा पुरविण्याबाबत

**(१३) ३०१०२ (१४-०४-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माहिती अधिकार कार्यकर्ते आणि सामाजिक कार्यकर्ते यांना पोलीस सुरक्षा पुरविण्याबाबत शासनाकडे मागणी केल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार माहिती अधिकार कार्यकर्ते तसेच सामाजिक कार्यकर्ते यांना पुरेशी सुरक्षा व्यवस्था देणे आवश्यक असतानाही त्याचे पालन होत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मा.उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार माहिती अधिकार कार्यकर्ते आणि सामाजिक कार्यकर्ते यांना सुरक्षा पुरविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-०८-२०१८) : (१)** होय, हे खरे आहे.
(२) सदर हे खरे नाही.

माहिती अधिकार कार्यकर्ते तसेच सामाजिक कार्यकर्ते यांनी पोलीस संरक्षणाची मागणी केल्यानंतर त्यांचे अर्जावर शासन निर्णय क्र.सीआरटी-२०१२/प्र.क्र.६९६/पोल-११, दिनांक २७/०२/२०१३ अन्वये गठीत समितीतर्फे विचार होवून समितीने दिलेल्या निर्णयानुसार तातडीने पोलीस संरक्षण पुरविण्यात येते.
(३) सदरहू प्रकरणी अर्जाच्या अनुषंगाने मागणी केल्यास जिवितास असलेल्या धोक्याबाबत संबंधित घटक प्रमुख तसेच राज्य गुप्तवार्ता विभाग यांच्याकडून प्राप्त अहवालानुसार समिती पोलीस संरक्षणाबाबतचा निर्णय घेते.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पिंपळगाव (ता.भिंवडी, जि.ठाणे) येथील सरस्वती माध्यमिक विद्‌यालयातील मुख्याध्यापिकेवर कारवाई करण्याबाबत

**(१४) ३०८७९ (२४-०४-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पिंपळगाव (ता.भिंवडी, जि.ठाणे) येथील सरस्वती माध्यमिक विद्‌यालयातील मुख्याध्यापिका श्रीमती स्मिता येवले यांनी शाळेतील शिक्षक श्री. संतोष मारुती वेखंडे यांना मानसिक त्रास देवून वेतनही दिले नसल्याने त्यांच्यावर व त्यांच्या कुटूंबियांवर उपासमारीची वेळ आली असून त्यांनी शासनाकडे इच्छा मरणाची परवानगी मागितली असल्याचे माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार श्री. वेखंडे यांना न्याय देण्याबाबत कार्यवाही करुन त्यांना मानसिक त्रास देणाऱ्या मुख्याध्यापिकेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०१-०८-२०१८) :** (१) अशी बाब नाही.
(२) श्री.वेखंडे हे अतिरिक्त झाल्याने त्यांचे समायोजन होत नाही तोपर्यंत मुळ शाळेच्या आस्थापनेवरुन वेतन अदा करावे असा तोंडी सूचना शिक्षणाधिकारी माध्यमिक, जिल्हा परिषद, ठाणे यांनी दिलेल्या होत्या. सदर प्रकरणी शिक्षणाधिकारी माध्यमिक यांनी सूनावणी घेवून श्री.वेखंडे सहायक शिक्षक यांना हजर करुन घेण्याबाबतची कार्यवाही करुन त्यांचे वेतन नियमानुसार अदा करण्याबाबत सूचना संबंधित संस्था व मुख्याध्यापक यांना दिलेल्या आहेत. सदर प्रकरणी मुख्याध्यापिकेवर कारवाई करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विनाअनुदानित व अनुदानित शाळांना निवासी दराने वीज पुरवठा करणेबाबत

**(१५) ३१९७३ (१८-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.गिरीशचंद्र व्यास : तारांकित प्रश्न क्रमांक २८३६२ ला दिनांक २१ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने निश्चित केलेल्या दरानुसार राज्यातील शाळा महाविद्यालयांना सार्वजनिक सेवा या वर्गवारीनुसार वीज दर आकारणी करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, महाराष्ट्र सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अंतर्गत नोंदणीकृत शिक्षण संस्था संचलित सर्वच अनुदानित-विनाअनुदानित शाळा,

महाविद्यालयांना विद्युत शुल्कातून सवलत मिळणे व निवासी दराने वीज पुरवठा करण्याची मागणी राज्यातील शाळा, महाविद्यालये, शिक्षण संस्था व शिक्षक संघटनांमार्फत सातत्याने करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शाळा महाविद्यालयांना शासनाकडून देण्यात येणारे वेतनेतर खर्च अनुदान प्रत्यक्ष खर्चाच्या तुलनेत अत्यंत कमी व अपुरे असल्याने राज्यातील सर्वच शाळा महाविद्यालयांना निवासी दराने/सवलतीने वीज पुरवठा करण्याबाबत शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) शाळा व महाविद्यालयांना सार्वजनिक सेवा वर्गवारीनुसार वीज बिलाची आकारणी करण्यात येते. लघुदाब सार्वजनिक सेवा वर्गवारीचे दर हे घरगुती वर्गवारीतील दराच्या तुलनेत कमी आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## एकोडी (ता.साडक अर्जूनी, जि.गोंदिया) गावातील भारतीय विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालयाच्या इमारतीसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत

**(१६) ३२२०० (११-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) एकोडी (ता.साडक अर्जूनी, जि.गोंदिया) गावातील जिल्हा परिषद भारतीय विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय येथील ६४ वर्षे जुनी इमारत जीर्ण झाली असल्याने विद्यार्थ्यांचा जीव धोक्यात असल्याचे दिनांक २२ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शाळेच्या इमारतीकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०३-१०-२०१८) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

एकोडी ता.गोंदिया, जि.गोंदिया येथील जिल्हा परिषद भारतीय विद्यालय व कनिष्ठ महाविद्यालय येथील जुन्या इमारतीला विशेष दुरूस्तीची आवश्यकता आहे. धोकादायक वर्गखोलीत शिक्षक वा विद्यार्थ्यांना जाण्यास/ बसण्यास मनाई करण्यात आली आहे. जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत सन २०१५-१६ व २०१६-१७ मध्ये सदर शाळेच्या दुरूस्ती/बांधकामासाठी रुपये ४३.०६ लक्ष निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये तक्रार पेट्या बसविण्याबाबत

**(१७) ३३४९८ (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शाळेतील शिक्षक, कर्मचाऱ्यांकडून विद्यार्थ्यांवर होणारे लैंगिक अत्याचार, शाळा प्रशासनाकडून विद्यार्थ्यांचा होणारा छळ अशा वाढत्या घटना लक्षात घेऊन राज्यातील सर्व माध्यमांच्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये विद्यार्थ्यांसाठी तक्रार पेटी बसविण्याची योजना दिनांक ०५ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास सुरु केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर योजनेचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शाळांमध्ये तक्रार पेटी बसविण्याबाबत तसेच तक्रारदार विद्यार्थ्यांना शासन संरक्षण देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०३-१०-२०१८) :** (१), (२) व (३) अंशत: खरे आहे.

शाळांतील विद्यार्थी-विद्यार्थीनींच्या सुरक्षिततेच्या उपाययोजनांचा भाग म्हणून शासनाने सर्व शाळांमध्ये तक्रारपेटी बसविण्याच्या सूचना परिपत्रकाव्दारे दिल्या आहेत.

शासनाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबतचे निर्देश सर्व शिक्षण उपसंचालक व शिक्षणाधिकाऱ्यांना देण्यात आले आहेत. या निर्देशांसोबतच तक्रारपेटया बसून अवलंबावयाची कार्यवाहीबाबतही मार्गदर्शन करण्यात आले आहे. तक्रारकर्त्याचे नाव गोपनीय ठेवून तक्रारीच्या स्वरूपानुसार तक्रारनिवारण करण्यात येते.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परभणी महानगरपालिकेतील शहर अभियंत्याच्या अवैध मालमत्तेबाबत

**(१८) ३३८३१ (११-०८-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी महानगरपालिकेतील शहर अभियंत्याने महाराष्ट्र नागरी सेवा वर्तणूक नियम, १९७९ च्या कलम १९ व २५ मधील तरतुदीचा भंग करून कुटुंबिय व हितसंबंधातील व्यक्तींच्या नावे कोटयवधी रूपयांची अवैध मालमत्ता व अपसंपदा जमा केली असल्याने त्यांची चौकशी करण्यात यावी अशी मागणी परभणी येथील पत्रकारांनी मा.मुख्यमंत्री व पोलीस महासंचालक, लाचलुचपत विभाग यांचेकडे सन २०१६-१७ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त शहर अभियंत्याने जमविलेल्या अपसंपदेची वरिष्ठस्तरावरून मालमत्तानिहाय चौकशी करण्यात आली काय,

(३) असल्यास, त्यात काय निष्पन्न झाले व तद्नुसार दोषीवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०८-२०१८) :** (१), (२), (३) व (४), होय,

अशा आशयाची तक्रार प्राप्त झाली असून लाचलुचपत प्रतिबंधक विभागाच्या प्रचलीत कार्यपद्धतीनुसार या तक्रारीची गोपनीय पडताळणी सुरू आहे.

---

## महागाव (जि.यवतमाळ) येथील पोलीस ठाण्यात पोलीस कर्मचाऱ्यांची संख्या वाढविण्याबाबत

**(१९) ३४१३१ (११-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महागाव (जि.यवतमाळ) येथील पोलीस ठाण्यात अपुऱ्या पोलीस कर्मचाऱ्यांमुळे तालुक्यात अवैध दारु, अवैध प्रवासी वाहतूक, चोऱ्या, दरोडे, मारामाऱ्या इत्यादी घटनात वाढ झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अपुऱ्या कर्मचाऱ्यांमुळे कामाचा ताण पाहता यासंदर्भात प्रशासनातर्फे पोलीस कर्मचाऱ्यांची संख्या वाढविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०८-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) पोलीस स्टेशन महागाव येथे गुन्हे, कायदा व सुव्यवस्था काम पहाता पोलीस कर्मचाऱ्यांची संख्या वाढविण्यासाठी वाढीव कर्मचाऱ्यांची मागणी असून पोलीस महासंचालक कार्यालयामार्फत सदर प्रस्तावावर कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## लोणी (ता.पुसद, जि.यवतमाळ) येथील गोठ्यास आग लागून झालेल्या नुकसानीबाबत

**(२०) ३४१३२ (१८-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लोणी (ता.पुसद, जि.यवतमाळ) येथील एका शेतातील गोठ्यास वीज तारांच्या घर्षणाने आग लागून लाखो रुपयांचे नुकसान झाले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर घटनेची चौकशी करुन दोषींवर काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) सदर घटनेची चौकशी विद्‌युत निरीक्षक, यवतमाळ यांनी केली असून आपत्तीग्रस्त शेतकऱ्यांकडून आवश्यक कागदपत्रांची पूर्तता झाल्यानंतर पुढील कार्यवाही महावितरण कंपनीमार्फत करण्यात येणार आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ठाणे पोलीस दलात कार्यरत असलेल्या महिला पोलीस कॉन्स्टेबलने आत्महत्या केल्याबाबत

**(२१) ३४६५० (१५-०९-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे पोलीस दलात कार्यरत असलेल्या श्रीमती सुभद्रा पवार, पोलीस कॉन्स्टेबल यांनी दिनांक ७ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास राहत्या घरी आत्महत्या केली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या प्रकरणी सहायक पोलीस आयुक्त श्री.शामकुमार निपुंगे यांचेवर आत्महत्येस प्रवृत्त केलेबाबत गुन्हा दाखल केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषींवर काय कारवाई केली वा करण्यात येत आहे, त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२७-०८-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) सदर बाबत कळवा पोलीस स्टेशन येथे गु.र. क्र. I २९०/२०१७ भा.दं.वि.क. ३०६, ३४ प्रमाणे दिनांक ०७/०९/२०१७ रोजी गुन्हा दाखल करण्यात आला आहे. या प्रकरणातील २ आरोपींना अटक करण्यात आली असून मा.न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यात आले आहे.

उक्त आरोपींना शासकीय सेवेतून निलंबित करण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहरातील झोपडपट्टी पुनर्वसन प्रकल्प रखडल्याबाबत

**(२२) ३५२५२ (०४-०१-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.किरण पावसकर, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक २६८२५ ला दिनांक ८ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरातील झोपडपट्टी पुनर्वसन प्रकल्प शासनाच्या उदासिन धोरणामुळे रखडले असल्याची बाब माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार पुणे शहरातील झोपडपट्टी पुनर्वसन प्रकल्प मार्गी लावणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०५-०९-२०१८) :** (१) नाही, हे खरे नाही.

(२) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे क्षेत्रातील झोपडपट्टी पुनर्वसन कार्याला गती मिळावी म्हणून विविध प्रशासनिक व वैधानिक उपाययोजना करण्यात आलेल्या आहेत व येत आहेत. प्राधिकरणासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी या पदावर भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्याची पूर्णवेळ नेमणूक करण्यात करण्यात आली आहे. झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्याच्या अनुषंगाने नगरविकास विभागाने दिनांक ११/०९/२०१४ रोजी नवीन नियमावली प्रसिध्द केली आहे. प्राधिकरणाच्या सुधारीत कर्मचारी आकृतिबंधास मंजूरी देण्यात आलेली आहे, तसेच, झोपडपट्टी धारकांची पात्रता यादी बनविण्यासाठी सक्षम प्राधिकारी अधिसूचित करण्यात आले आहेत. सुधारित झोपडपट्टी अधिनियमानुसार नियमावली सुधारित करण्याची कार्यवाही सुरु आहे. प्राधिकरणाच्या क्षेत्रातील झोपडपट्ट्यांचे तंत्रज्ञानयुक्त सर्वेक्षण देखील करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आदिवासी उपयोजनेंतर्गत लासलगाव, देवगाव (ता.निफाड) व अंदरसुल (ता.येवला) गावातील महिलांचे सक्षमीकरण करण्याबाबत

**(२३) ३६१०३ (०२-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक जिल्ह्यात आदिवासी जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या वैशिष्ट्य/नाविन्यपूर्ण योजनेतून आमदार आदर्श ग्राम योजनेसाठी निवड करण्यात आलेल्या लासलगाव, देवगाव (ता.निफाड) व अंदरसुल (ता.येवला) या गावातील महिलांचे सक्षमीकरण करण्यासाठी दुधाळ गाईचा पुरवठा करणे हा पथदर्शी प्रकल्प राबविण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी जिल्हा प्रशासन व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांचेकडे दिनांक ४ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (२१-०९-२०१८) :** (१) खरे आहे.
(२) व (३) लासलगाव, देवगाव (ता.निफाड) व अंदरसुल (ता.येवला) जि.नाशिक या गावांचा समावेश आदिवासी उपाययोजनेंतर्गत नसल्याने या गावांतील महिलांना नाविन्यपूर्ण योजनेंतर्गत लाभ देता येणार नाही.

---

## मुंबईत इमारतींच्या गच्चीवर उपहारगृह सुरु करण्याच्या योजनेबाबत

**(२४) ३६१३२ (०४-०१-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईत इमारतींच्या गच्चीवर उपहारगृह सुरु करण्याच्या योजनेला दिनांक १ नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास मान्यता देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या योजनचे स्वरुप काय आहे व त्याची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे,
(३) असल्यास, उक्त योजना कार्यान्वित करताना कोणत्या सुरक्षात्मक उपाययोजना आखण्यात आल्या वा येत आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) ज्या व्यावसायिक मॉल, इमारत, वाणिज्य मॉल, निवासी हॉटेल यांना अनुज्ञापन प्राप्त उपहारगृह अस्तित्वात आहे अशा इमारतींच्या खुल्या गच्चीवर सामायिक खुल्या गच्चीवर (आश्रय क्षेत्राचा भाग सोडून) अटी व शर्तींच्या अधीन राहून खाद्यपदार्थ पुरविणे असे या योजनेचे स्वरुप आहे.
(३) सदर योजना कार्यान्वित करतांना सुरक्षात्मक उपाययोजनेबाबतच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत:-

- भोगवटा प्रमाणपत्र असलेल्या मंजूर इमारतीमधील खुल्या गच्ची/अंशत: खुली गच्ची/सामायिक खुली गच्ची (आश्रय क्षेत्राचा भाग सोडून) वर खानपान पुरविण्याकरीता परवानगीसाठी रितसर प्रस्ताव संबंधित विभागाच्या वैद्यकीय आरोग्य अधिकारी यांच्याकडे सादर करावा.
- वहिवाटदारांना कोणताही उपद्रव होऊ नये याकरीता खुल्या गच्चीवर/पॉकेट गच्चीवर/ सामायिक गच्चीवर (आश्रय क्षेत्राचा भाग सोडून) अन्नपदार्थ सेवा पुरविण्याच्या प्रस्तावासाठी केवळ व्यावसायिक वाणिज्य इमारत/खानपान व राहण्याची सोय असणाऱ्या निवासी हॉटेलांचाच विचार करण्यात यावा.
- गच्चीवर एल.पी.जी. गॅस किंवा इतर ज्वलनशिल साधन वापरुन खाद्यपदार्थ/शिजवता व बनविता येणार नाहीत. फक्त इंडक्शन/मायक्रोवेव्ह आणि इलेक्ट्रीक ओव्हनचा वापर करण्याची परवानगी देण्यात येईल.
- अन्नपदार्थ सेवा पुरविण्याकरीता वापरावयाचे गच्चीक्षेत्र कोणत्याही तात्पुरत्या/कायमस्वरुपी आवरणाने आच्छादलेले नसावे. सदर खुल्या गच्चीवर पावसाळी छत/छत्री/ताडपत्री यांचे आवरण उभारण्यास

परवानगी देण्यात येणार नाही. गच्चीसाठी व आवरणासाठी कोणतीही साधने उभारता येणार नाहीत व गच्चीचा वापर सदासर्वकाळ मोकळ्या आकाशाखाली असावा.

- गच्चीच्या सदर वापरामुळे शेजारील इमारतींना त्रास होणार नाही किंवा त्यांची तक्रार येणार नाही याची दक्षता घ्यावी. अशा प्रकारचा त्रास होत असल्यास, देण्यात आलेली परवानगी रद्द करण्यात येईल.
- अन्नपदार्थ पुरविण्याची वेळ ही पोलीस कायदा आणि महानगरपालिका दुकाने आणि आस्थापना कायदा यातील तरतुदींनुसार असेल.
- गच्चीवरील विद्युत दिवे/रोषणाई आणि ध्वनीची तीव्रता ही सन १९८६ च्या पर्यावरण सुरक्षा कायद्याच्या संबंधित तरतुदीच्या अधीन असावी.
- अर्जदारास बृहन्मुंबई महानगरपालिका व त्यांचे अधिकारी यांस कोणताही धोका, तोडफोड, सुरक्षितता, मालमत्ता, जिवीतहानी तसेच न्यायालयीन लढाई वगैरे पासून कोणतेही नुकसान होणार नाही असे हमीपत्र दस्तऐवज (Indemnity Bond) सादर करावे लागेल.
- दुर्घटना किंवा अपघात टाळण्याकरीता परवानाधारकाने योग्य ती सुरक्षितता व दक्षतेसंदर्भात उपाययोजना योजाव्यात आणि अशा कोणत्याही दुर्घटनेस किंवा अपघातास परवानाधारक स्वतः जबाबदार राहील.
- गच्चीवर खाद्यसेवेच्या वापरासाठी परवाना दिलेल्या इमारतीच्या गच्चीच्या किनाऱ्यापासून १० मी. पर्यंत कोणतीही रहिवासी इमारत असू नये.
- जर गच्चीवर तटरक्षक भिंतीची उंची १.५ मी. पेक्षा कमी असेल तर ती जास्तीत जास्त उंची १.५ मी. पर्यंत जाळी किंवा उघडता येणाऱ्या काचेच्या तावदानाने अन्वयेच वाढवता येईल.
- परवानाधारकाने ग्राहकांना पुरविण्यात येणारे खाद्यपदार्थ खाण्यास योग्य असल्याबाबतची दक्षता घ्यावी. तसेच सदर अन्न आजुबाजूच्या झाडावरुन पडणारी पाने, पक्षांची विष्ठा, धूळ माशी यामुळे दुषित होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.
- खुल्या गच्चीस खाद्य पुरवठा करण्याची परवानगी देण्यापूर्वी मुख्य अग्निशमन अधिकारी यांचेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करणे

अनिवार्य आहे व त्यांनी सुचविलेल्या सुरक्षिततेच्या बाबींबद्दलच्या अटींची पूर्तता केली असल्याची खात्री परवानगी देण्यापूर्वी करणे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सिडकोच्या अधिसूचित क्षेत्रातील भाडेपट्ट्याने वाटप केलेल्या मिळकती फ्री होल्ड करण्याबाबत

**(२५) ३६१६४ (०४-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबई सोबतच नवीन नाशिक, नवीन औरंगाबाद व नवीन नांदेड शहरांमधील सिडकोच्या अधिसूचित क्षेत्रातील भाडेपट्ट्याने वाटप केलेल्या मिळकती फ्री होल्ड करण्याबाबत दिनांक ११ ऑगस्ट, २०१७ रोजीच्या सिडको संचालक मंडळाच्या बैठकीत ठराव करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाशिक सिडको परिसरातील जमिनी फ्री होल्ड करणेसाठी स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक ८ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनास निवेदन दिलेले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रश्न भाग (१) मधील ठरावाची अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-०८-२०१८) :** (१) व (२) होय.

(३) नवी मुंबई जमीन विनियोग विनियम (सुधारित), २००८ नुसार भाडेपट्ट्याने देण्यात आलेल्या मालमत्तांच्या हस्तांतरण व वापर बदलाबाबत निश्चित करण्यात आलेल्या काही अटी व शर्ती शिथील करुन भाडेपट्टा करारनाम्याच्या कालावधीत सुधारणा करण्याबाबतचा संचालक मंडळाने पारित केलेला दिनांक ११/०८/२०१७ चा ठराव क्रमांक ११९१२ शासन मान्यतेसाठी दिनांक २८/०९/२०१७ रोजी सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १३/०३/२०१८ रोजी झालेल्या

बैठकीतील निदेशास अनुसरुन प्रस्तुत प्रस्तावाच्या आर्थिक व्यवहार्यतेचा तपशील दिनांक २४/०४/२०१८ रोजीच्या पत्रानुसार सिडको महामंडळाकडून प्राप्त झाला आहे. सिडको महामंडळाने सादर केलेल्या प्रस्तावाची सविस्तर तपासणी करुन उचित निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अकोला पाणीपुरवठा विभागाच्या अंदाजपत्रकीय तरतुदीत वाढ करण्याबाबत

**(२६) ३६४४२ (०२-०१-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकोला पाणीपुरवठा विभागाने सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात दोन कोटी रुपयांनी अंदाजपत्रकीय तरतुदीत वाढ करावी अशी मागणी पाणीपुरवठा विभागाने केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मागील सहा महिन्यात ३ कोटी ८४ लाख रुपये खर्च झाले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (०४-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या योजनांकरीता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरीता जिल्हा नियोजन विकास समिती अंतर्गत रुपये ७८९.५१ लाख इतक्या रकमेची तरतुद करण्यात आलेली आहे. सदर निधीपैकी रुपये २००.०० लाख इतकी रक्कम प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजनेच्या देखभाल दुरुस्तीकरीता मंजूर करण्याची विनंती कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी जिल्हा नियोजन अधिकारी यांना केली आहे.

(२) अंशत: खरे आहे. माहे जानेवारी, २०१८ अखेरपर्यंत अकोला जिल्ह्यातील पाणीपुरवठा योजनांच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीकरीता रुपये ७७५.०४ लाख इतकी रक्कम खर्च झालेली आहे.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगाव) येथील पोलीस स्टेशन मधील कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरणेबाबत

**(२७) ३६८४८ (०४-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर (जि.जळगाव) येथील पोलीस स्टेशन मधील कर्मचारी संख्या अपूर्ण असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मंजूर पदे १०२ असताना ५५ कर्मचारी कार्यरत असल्याचे ही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून रिक्त पदे भरणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०८-२०१८) :** (१) व (२) अमळनेर पोलीस स्टेशनमध्ये पोलीस कर्मचाऱ्यांची मंजूर पदे ९८ इतकी असून सद्य:स्थितीत अंमळनेर पोलीस स्टेशन येथे ७६ पदे भरलेली आहेत.
(३) पोलीस शिपाई संवर्गातील दिनांक ३१/१२/२०१८ अखेर रिक्त होणारी पदे भरण्यासाठी पोलीस भरती-२०१८ राबविण्यात आली असून पोलीस भरती-२०१७ मध्ये भरती झालेले उमेदवार प्रशिक्षण पूर्ण करुन परत आल्यानंतर अंमळनेर पोलीस स्टेशन येथील रिक्त पदे भरण्याबाबत कार्यवाही नियोजित आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## भारनियमन कमी करण्यासाठी खाजगी वीज प्रकल्पातून वीज खरेदी करण्याबाबत

**(२८) ३७०६४ (०२-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात महावितरणने महानिर्मितीबरोबरच खाजगी व केंद्रीय वीज प्रकल्पातून २९४३० मेगावॅट विजेच्या खरेदीसाठी करार केले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त करारानुसार शासनाला किती वीज उपलब्ध होणार आहे, त्यामुळे किती प्रमाणात भारनियमन दूर होणार आहे, त्याची सद्य:स्थिती काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) एकूण वीज खरेदी करार क्षमता ३१२९८ मे.वॅ. पैकी औष्णिक वीज निर्मिती क्षमता २०१३४ मे.वॅ. असून वायू (गॅस)-१०७६ मे.वॅ. अणुऊर्जा-६९० मे.वॅ. पैकी महावितरणला ८० ते ८५ % विजेची उपलब्धता होणे अपेक्षित आहे. जल विद्‌युत निर्मिती केंद्रातून अपेक्षित वीज ३०७४ मे.वॅ. असून ती उपलब्ध पाणी साठा व गरजेनुसार वापरली जाते. तसेच अपारंपारिक स्त्रोत्राद्‌वारे ६३२३ मे.वॅ. क्षमतेपैकी क्षमता वापर घटक (CUF) व हंगामानुसार सध्या १००० मे.वॅ. पर्यंत वीज उपलब्ध असते. त्यामुळे सद्य:स्थितीत महावितरणकडे करारीत क्षमतेमधून पुरेशी वीज उपलब्ध होत असल्याने भारनियमन करण्याची गरज नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईत हवामानाचे अचूक अंदाज दर्शविणारे दुसरे डॉप्लर रडार बसविण्याबाबत

**(२९) ३७१८७ (०४-०१-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत हवामानाच्या अचूक अंदाज दर्शविणारे दुसरे डॉप्लर रडार बसविण्याच्या जागेबाबत मुंबई महानगरपालिका व राज्य शासनामध्ये वाद सुरु असल्याचे दिनांक ८ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, दोघांमध्ये सुरु असलेल्या वादावरुन मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार दिनांक २९ ऑगस्ट, २०१७ रोजीच्या घटनेची पुनरावृत्ती होऊ नये याकरीता उपाययोजना करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०६-२०१८) :** (१), (२) व (३) डॉप्लर रडार उभारणीसाठी वेरावली उच्चस्तर जलाशय येथील ३० मी x ३० मी जागेचा ताबा पोच रस्त्यासह भारत मौसम विज्ञान विभाग यांना रुपये १/- प्रति चौ.मी. याप्रमाणे वार्षिक रुपये ९००/- भुईभाडे आकारुन दिनांक १३/१०/२०१७ रोजी देण्यात आला आहे.

---

## बार्शी (जि.सोलापूर) येथे नविन पोलीस स्टेशन सुरु करण्याबाबत

**(३०) ३७४५४ (०४-०१-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बार्शी (जि.सोलापूर) येथे नविन पोलीस स्टेशन सुरु करण्याबाबत पोलीस अधीक्षक, सोलापूर यांनी आश्वासन देऊनही नवीन पोलीस स्टेशन सुरु करण्यात आले नसल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, बार्शी येथे नविन पोलीस स्टेशन सुरु करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०८-२०१८) :** (१) व (२) बार्शी तालुका पोलीस ठाणे निर्माण करण्याची अधिसूचना दिनांक ३०/०६/२०१७ रोजी निर्गमित करण्यात आली असून सदर पोलीस ठाणे दिनांक ०१/०५/२०१८ रोजी कार्यान्वित झालेले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहराच्या जुन्या हद्दीच्या विकास आराखड्याबाबत

**(३१) ३७८४२ (०६-०४-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहराच्या जुन्या हद्दीच्या विकास आराखड्याची (डीपी) काटेकोर अंमलबजावणी व्हावी याकरीता अतिरिक्त मनुष्यबळाची नियुक्ती करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याकरीता किती अतिरिक्त मनुष्यबळाची नियुक्ती करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, सदर प्रकिया कैंव्हापर्यंत पूर्ण होण्याचे अपेक्षित आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१८-०८-२०१८) :** (१) होय.

(२) महानगरपालिका आयुक्त यांनी दिनांक २२/०५/२०१८ रोजीचे आज्ञापत्रान्वये १५ अधिकारी व सेवकांची नियुक्ती केली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## बारामती नगरपरिषदेतील रिक्त पदे भरण्याबाबत

**(३२) ३७८४७ (०६-०४-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या सुधारित आकृतिबंधानुसार राज्यस्तरीय संवर्गातील बारामती नगरपरिषदेत मंजूर पदापैकी ३० पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, "अ" वर्ग नगरपरिषदेचा आकृतिबंध मंजूर होऊन दोन वर्षाचा कालावधी होवूनही रिक्त जागांवर कर्मचारी वर्ग उपलब्ध झालेला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सध्य:स्थितीमध्ये बारामती नगरपरिषदेतील अग्निशमन सेवा विभाग, नगररचना विभाग अधिकाऱ्यांविनाच कार्यरत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०८-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२), (३) व (४) शासनाने राज्यातील नगरपरिषदांमधील राज्यस्तरीय संवर्गातील पदांचा सुधारित आकृतिबंध दिनांक १२ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर केला आहे. तसेच भरतीचे सुधारीत सेवा नियम दिनांक ३० जानेवारी, २०१८ रोजी मंजूर केले आहेत.

राज्यात राज्यसंवर्गातील एकूण मंजूर पदांपैकी पदोन्नतीची १००९ पदे व सरळसेवेची २७६३ पदे रिक्त आहेत.

नगरविकास विभाग, शासन निर्णय दिनांक ७ मार्च, २०१७ अन्वये अग्निशमन संवर्ग वगळता उर्वरित पदे भरण्याकरीता मान्यता देण्यात आली आहे.

त्यानुसार सरळसेवेची रिक्त पदे भरण्यासाठी दिनांक ७ एप्रिल, २०१८ रोजी १८८९ पदांसाठी जाहिरात प्रसिद्ध करण्यात आली असून दिनांक १८ ते २३ मे, २०१८ च्या दरम्यान पूर्व परीक्षा घेण्यात आली आहे. सदर पदभरतीची कार्यवाही ही माहे सप्टेंबर, २०१८ पर्यंत पूर्ण करण्यात येणार आहे.

पदभरतीअंती नगरपरिषदांमध्ये राज्यसंवर्गीय पदांवर कर्मचाऱ्यांना नियुक्ती देण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल. तसेच बारामती नगर परिषदेंतर्गत संवर्गातील मंजूर रिक्त पदे आवश्यकतेनुसार भरण्यात येतील.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे येथील ज्ञानोदय विद्यालयाच्या शिक्षकावर प्राणघातक हल्ला झाल्याबाबत

**(३३) ३८१९३ (०६-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे येथील ज्ञानोदय विद्यालयाचे शिक्षक श्री.एम.एम. प्रजापती हे फिरावयास गेले असता दिनांक ३ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास सायंकाळी त्यांच्यावर प्राणघातक हल्ला करुन गंभीर जखमी केल्या प्रकरणाची तक्रार त्यांच्या मुलाने पोलीस स्टेशन, ठाणे येथे नोंदविली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त तक्रारीनुसार चौकशी करुन गुन्हेगारांना अटक करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०७-२०१८) :** (१) व (२) होय.
सदरहू प्रकरणी ठाणे पोलीस आयुक्तालयांतर्गत वर्तकनगर पोलीस स्टेशन, ठाणे येथे फिर्यादीने दिलेल्या तक्रारीनुसार गु.र.क्र. I ३३६/२०१७, भा.द.वि.क. ३०७, ३२६, १२०(ब), ३४ आर्म ॲक्ट कलम ४(२५), सह मपोकाक ३७(१) १३५ प्रमाणे दिनांक ४/१२/२०१७ रोजी गुन्हा दाखल करण्यात आला असून आठ आरोपींना अटक करण्यात आली असून दोषारोपपत्र दाखल करण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील देवनार स्मशानभूमीत गर्दुल्ल्यांकडून स्मशानात होत असलेल्या सरणाच्या चोरीबाबत

**(३४) ३८६१४ (०६-०४-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामनिवास सिंह, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील देवनार येथील स्मशानभूमीत अमली पदार्थांचे सेवन करण्यासाठी गर्दुले तेथील सरणाची विक्री करत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे याठिकाणी सातपैकी केवळ दोन पायर्स सध्या वापरण्यालायक उरले असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या विषयी स्मशानभूमीतील कर्मचाऱ्यांनी स्थानिक पोलीस स्टेशन व महानगरपालिका अधिकाऱ्यांना वारंवार तक्रार करूनही दोन्ही यंत्रणा याकडे दुर्लक्ष करीत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार सार्वजनिक मालमत्तेची चोरी करणाऱ्या गर्दुल्ल्यांवर व दुर्लक्ष करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२७-०८-२०१८) :** (१) व (२) सदर प्रकरणी पोलीस ठाणे येथे देवनार स्मशानभुमीतून नशा करणाऱ्या लोकांनी जळावू लाकुड व लोखंडी रॉड चोरुन नेल्याबाबत तक्रार दाखल आहे.

(३) व (४) हे खरे नाही.

सदर स्मशानभुमी ठिकाणी देवनार पोलीस ठाणेकडून तिन्ही वेळेस पेट्रोलिंग वाहनांद्वारे गस्त घालण्यात येत असून साध्या गणवेशातील पोलीसांची गस्त सुध्दा चालु असते. त्यामुळे, सदर ठिकाणी नशा करणाऱ्या लोकांचा त्रास नाही.

तसेच, देवनार पोलीस ठाणेचे अधिकारी व गुंडा विरोधी पथकातील अधिकारी सदर परिसरात वेळोवेळी भेट देत असतात. मोबाईल वाहने, बीट मार्शल यांना गस्ती दरम्यान भेटी देण्याबाबत सुचित करण्यात आले आहे.

सदर ठिकाणी चोरी होऊ नये म्हणून उपाययोजना करण्यात आल्या आहेत असून चोरीची घटना घडल्यास त्वरेने गुन्हा नोंद करुन तो उघडकीस आणण्याची तजवीज ठेवण्यात येते.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात कृषी पंपांना १२ तास वीज पुरवठा करण्याबाबत

**(३५) ३८७२१ (०५-०४-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी : तारांकित प्रश्न क्रमांक ३५३८० ला दिनांक १५ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात पाण्याअभावी पिकांचे नुकसान होवू नये म्हणून १२ तास विद्‌युत पुरवठा करण्याचे शासनाने महावितरण कंपनीस आदेश देवूनही अंमलबजावणी होत नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महावितरणच्या औरंगाबाद परिमंडळात शेतकऱ्यांनी सन २०१० मध्ये कोटेशनच्या रकमासह कागदपत्रांची पुर्तता करुनही १०११४ कृषी पंप जोडणीविना प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार औरंगाबाद येथील प्रलंबित जोडण्या व गाव पातळीवर शेतीसाठी १२ तास विद्‌युत पुरवठा करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१२-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) हे खरे नाही.

(३) विदर्भ व मराठवाड्यातील प्रलंबित कृषी पंपांना वीज जोडण्या देण्याच्या विशेष योजनेव्दारे औरंगाबाद परिमंडळात सन २०१५-१६ ते ऑगस्ट, २०१८ अखेर १७२५० कृषी पंपांना वीज जोडणी महावितरण कंपनीमार्फत देण्यात आल्या

आहेत. उर्वरीत प्रलंबित कृषीपंप वीज जोडण्या उच्च दाब वितरण प्रणाली योजनेव्दारे देण्यात येणार आहेत.

कमी पर्जन्यमान झालेल्या गावातील कृषी पंपाना अतिरिक्त वीज पुरवठा देण्याकरीता संबंधित जिल्ह्याचे पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत दिनांक ७/९/२०१७ च्या शासन निर्णयान्वये आदेश देण्यात आले होते. सदर समितीच्या शिफारशीनुसार जिल्हाधिकाऱ्यांनी महावितरण कंपनीस त्यांच्या जिल्ह्यात अतिरिक्त वीज पुरवठा करण्याचे आदेश द्यावयाचे होते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## घर बांधण्यास सिडकोकडून परवानगी मिळणेबाबत

**(३६) ३९१९२ (०६-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबई प्रकल्पग्रस्त शेतकरी यांच्या पोदी नं. १, गावठाण पाडातील जुन्या-पडीक घरांच्या जमिनीवर इतर हक्कास "शासनातर्फे सिडको" असल्यामुळे बांधकामास मंजूरी मिळत नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रकल्पग्रस्त शेतकऱ्यांचे रहाते वडिलोपार्जित घरांची तसेच बिनशेती जमिनीवरील घरांची दुरूस्ती तसेच त्याच जागेत नव्याने घर बांधण्यास परवानगी सिडकोकडून देण्यात येत नसल्यामुळे भविष्यात येथील प्रकल्पग्रस्तांचे परिवार हे बेघर होण्याची शक्यता निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार सदर बांधकामास परवानगी देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-०८-२०१८) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.

नवी मुंबई प्रकल्पग्रस्त शेतकरी यांच्या पोदी नं.१ गावठाण पाड्यातील जुन्या-पडीक घरांच्या जमिनीवर बांधकाम मंजुरीसाठी सिडकोकडे अर्ज प्राप्त

झालेले नाहीत. तथापि, नवी मुंबई प्रकल्पांतर्गत सार्वजनिक प्रयोजनार्थ संपादित केलेल्या जमिनी, सिडको महामंडळाकडे हस्तांतरित झाल्यानंतर महामंडळामार्फत भाडेपट्टा तत्वावर वितरीत करण्यात आलेल्या भूखंडावर बांधकाम परवानगी देण्यात येते.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शेतकऱ्यांना मोफत वीज पुरवठा करणेबाबत

**(३७) ३९४४० (०५-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तेलंगणा राज्याप्रमाणे राज्यातील शेतकऱ्यांच्या कृषी पंपांना २४ तास मोफत वीज पुरवठा करण्याची मागणी शेतकरी मिशन संघटनेने माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान शासनाकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१२-०७-२०१८) :** (१) अशी मागणी केल्याचे आढळून येत नाही.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील मुस्लीम मेहतर समाज लाड-पागे समितीच्या शिफारशी पासून वंचित असल्याबाबत

**(३८) ४०३८२ (०५-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील मुस्लीम मेहतर समाजास लाड-पागे समितीच्या शिफारशीपासून वंचित ठेवण्यात आले असल्याने याबाबत मा.सामाजिक न्याय मंत्री यांचेकडे दिनांक २० ऑक्टोबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास बैठकीचे आयोजन करण्यात आले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर बैठकीत काय निर्देश देण्यात आले, त्यानिर्देशानुसार विभागाने कोणती कार्यवाही केली तसेच लाड-पागे समितीच्या शिफारशीनुसार राज्यातील अनेक सफाई कामगारांच्या पाल्यांना नियुक्त्या देण्यात आल्या नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०६-०७-२०१८) :** (१) दिनांक २० ऑक्टोबर, २०१६ रोजी मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचेकडे बैठक आयोजित करण्यात आली होती.
(२) व (३) सदर दिनांक २०/१०/२०१६ च्या बैठकीत - शासन निर्णय दिनांक २५/६/२००८ नुसार मुस्लीम मेहतर ही जात विशेष मागास प्रवर्गात समाविष्ठ झालेली असल्याने, या घटकातील सफाई कामगार वारसा हक्कापासून वंचित राहू नयेत म्हणून, दिनांक २५/६/२००८ पुर्वीच्या मुस्लीम मेहतर सफाई कामगारांच्या वारसांस वारसा हक्काने नियुक्ती देणेबाबत सुधारीत करावयाच्या शासन निर्णयात सदर बाब समाविष्ट करण्यात यावी असे निर्देश देण्यात आले.

तसेच लाड-पागे समितीच्या शिफारशीनुसार सफाई कर्मचाऱ्यांच्या पाल्यांना नियुक्ती देण्याची कार्यवाही संबंधित कार्यालयाकडून सुरु आहे.

---

## ठाणे येथे वातानुकूल यंत्रांच्या दुरुस्तीचे काम सुरु असताना स्फोट होऊन एका व्यक्तीचा मृत्यू झाल्याबाबत

**(३९) ४०५३७ (०६-०४-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे येथील सिध्दांचल सोसायटी परिसरातील एका व्यायामशाळेत वातानुकूल यंत्रांच्या दुरुस्तीचे काम सुरु असताना स्फोट होऊन सागीर अन्सारी

याचा मृत्यू झाला असून गोलु चौधरी व अविनाश मोर्या आणि अंकित सिंग हे गंभीर जखमी झाल्याची घटना दिनांक २३ जानेवारी, २०१८ रोजी वा त्या सुमारास घडली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार उपरोक्त दुर्घटनेत मृत पावलेल्यांच्या नातेवाईकांना तसेच जखमींना आर्थिक मदत देण्यात आली आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.

दिनांक २३/०१/२०१८ रोजी सुमारे १७.०० चे सुमारास भिमाशंकर भवन, वसंत विहार, ठाणे पश्चिम या ठिकाणी असलेल्या “द जिम” या व्यायामशाळेच्या वातानुकूलन यंत्राच्या दुरुस्तीचे काम सुरु असतांना वातानुकूलन यंत्राच्या कॉम्प्रेसरचा स्फोट होऊन त्यात वातानुकूलन यंत्राची दुरुस्ती करणारा तंत्रज्ञ ठार झाला. तर त्यासोबत काम करणारे इतर तीन जण जखमी झाले आहेत.
(२) याप्रकरणी पो.स्टे. चितळसर येथे दिनांक २३/०१/२०१८ रोजी गु.र.क्र. ११/२०१८, भा.दं.वि. कलम ३०४(अ), ३३६, ३३७ व ३३८ प्रमाणे गुन्हा नोंद करण्यात आला असून गुन्हयाचा तपास चालू आहे.

सदर घटना ही नैसर्गिक आपत्तीमध्ये मोडत नसल्याने याप्रकरणी मृत वा जाखमींच्या नोतेवाईकांना आर्थिक मदत देण्यात आलेली नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोलापूर येथील मुख्य आगारात ठेवलेल्या सहा बसेस जळाल्याबाबत

**(४०) ४०७१० (०६-०४-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सोलापूर येथील बुधवार पेठेतील मुख्य आगारात ठेवलेल्या बस गाड्यांपैकी सहा बस गाड्या अचानक जळाल्या असून त्या जळाल्या नाहीत तर जाळण्यात आल्या आहेत त्यामुळे त्याची चौकशी करण्याची मागणी सोलापूर

महापालिकेच्या सदस्यांनी माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जळालेल्या सहा बसेसच्या चेसी नादुरुस्त असतानाही व कोणाचीही मान्यता न घेता किट बसविण्यात आलेले होते त्यामुळे या प्रकरणाचा संशय येतो, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-०६-२०१८) :** (१) होय, अशी बाब आढळून आली आहे.

दिनांक ०१/०१/२०१८ रोजी बुधवार पेठेतील डॉ.बाबासाहेब आंबेडकर बस स्थानक येथे अज्ञात व्यक्तीकडून बसेसना आग लावण्यात आल्याचे दिसून आले आहेत.

(२) हे खरे नाही.

चेसिस क्रॅक बसेसपैकी जागा अभावी ३० बसेस बुधवार पेठ बस डेपो येथे उभ्या करण्यात आल्या होत्या. त्यापैकी ७ बसेस जळाल्या असून जळालेल्या बसेसना किट बसविण्यात आलेली नाहीत.

(३) व (४) यासंदर्भात दिनांक ०१/०१/२०१८ रोजी सुरक्षा रक्षक म्हणून सेवेत असलेले श्री.श्रीकांत सातपुते यांना कर्तव्यात कसूर केल्यामुळे त्यांच्यावर निलंबनाची कारवाई करण्यात आली आहे. तसेच त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु करण्यात येत आहे.

दिनांक ०१/०१/२०१८ रोजी अज्ञात व्यक्तीविरुध्द जोडभावी पेठ पोलीस स्टेशन येथे एफ.आय.आर अन्वये गुन्हा दाखल केला आहे. त्यानुषंगाने या प्रकरणी पोलीस तपास सुरु आहे.

---

## तासीका तत्वावरील प्राध्यापकांच्या नियुक्तीच्या शैक्षणिक पात्रतेबाबत

**(४१) ४१५०७ (०१-०८-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८७१३ ला दिनांक ९ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उच्च व तंत्रशिक्षण विभागाचे परिपत्रक क्र. संकिर्ण-२०१२/(२३७/१२) वि.शी.-१ दिनांक १७/०९/२०१३ अन्वये सामाजिक आरक्षणानुसार तात्पुरत्या स्वरुपात किंवा तासीका तत्वावर मागासप्रवर्गातील नेट/सेट/पीएचडी धारक उमेदवार न मिळाल्यास इतर शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्यास विद्यापीठ नियुक्ती मान्यता देते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, खुल्या व ओ.बी.सी.प्रवर्गातील उमेदवाराची तासीका तत्वावर नेमणूकीसाठी विना नेट/सेट/पीएच.डी. धारकास विदयापीठ नियुक्तीस मान्यता देत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना शिकवण्यासाठी शिक्षक मिळत नसल्याने, मागासवर्गीय व खुल्या ओ.बी.सी.वर्गातील उमेदवारास तासीका तत्वावर नियुक्तीसाठी सारखीच शैक्षणिक अर्हता ठेवण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०१-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील रेशीम शेती आणि व्यापार वाढीबाबत

**(४२) ४१६२६ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक ३८०२५ ला दिनांक ५ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वस्त्रोद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील रेशीम कोष उत्पादक शेतकऱ्यांची आधारभूत किंमतीने शासनस्तरावरून कोष खरेदी सुरु करून इतर राज्याच्या धर्तीवर प्रतिकिलो ५० रुपये प्रोत्साहन अनुदान देण्याचा निर्णय शासनाच्या विचाराधीन असून जालना कोष खरेदी विक्री बाजारपेठ कार्यान्वित झाल्यानंतर याबाबत निर्णय होणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कर्नाटक राज्यातील रामनगरम येथील रेशीम कोष बाजारपेठेच्या धर्तीवर जालना येथील प्रस्तावित रेशीम कोष बाजारपेठ केंव्हा सुरु होणार आहे,

(३) असल्यास, कपाशीच्या शेतीला पर्याय म्हणून शेतकरी रेशीम शेतीकडे वळला असून या शेतकऱ्यांना प्रोत्साहन देण्यासाठी शासन कोणकोणत्या योजना सुरु करत आहे,

(४) असल्यास, म.न.रे.गा. अंतर्गत रेशीम उत्पादक शेतकऱ्यांना वैयक्तिक आणि सांघिक स्वरुपात लाभ देण्यासाठी शासन कोणती उपाययोजना करत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०१-१०-२०१८)** : (१) होय.

(२) रा.कृ.वि.यो. अंतर्गत जालना येथे कोष बाजारपेठ उभी करण्यास शासन निर्णय दिनांक २४/१०/२०१७ अन्वये रु ६१९.५९ लक्षच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. रुपये ६१९.०० लक्ष निधी रेशीम संचालनालयास उपलब्ध करुन देण्यात आला असून संचालक (रेशीम) यांनी हा निधी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना यांच्याकडे वर्ग केला आहे. रा.कृ.वि. योजनेंतर्गत जालना कोष बाजारपेठ उभारणीचे काम प्रगतीपथावर आहे.

कृषी उत्पन्न बाजार समिती, जालना येथे रेशीम कोष खरेदी विक्री बाजारपेठेचे कामकाज दिनांक २१/०४/२०१८ पासून प्रायोगिक तत्वावर सुरु करण्यात आले आहे.

(३) राज्यातील रेशीम विकास व विस्तार अंतर्गत शेतकऱ्यांना खालील योजनांतून अनुदान देण्यात येत आहे.

१. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना.
२. जिल्हा वार्षिक योजना.
३. राष्ट्रीय कृषी विकास योजना.

४. केंद्र पुरस्कृत-सिल्क समग्र योजना - ISDSI (Integrated Scheme for Development of Silk Industry) (सदर योजना २०१८-१९ व २०१९-२० करीता प्रस्तावित करण्यात आली आहे.)

(४) शासन निर्णय दिनांक ३१/०३/२०१६ अन्वये राज्यामध्ये रेशीम उत्पादक शेतकऱ्यांसाठी रेशीम उद्योग विकास योजना राबविणे व रेशीम किटक संगोपनगृह बांधकाम योजनेस मान्यता दिलेली असून सदरची योजना ही वैयक्तिक लाभार्थ्यांसाठी एक एकरसाठी आहे.

मनरेगा योजनेंतर्गत एक एकर वरुन दोन एकर लाभक्षेत्र वाढविण्यासाठी उपाययोजना करण्यात येत आहे. तसेच सदरची योजना ही वैयक्तिक लाभार्थ्यांची असल्यामुळे त्यांचा सांघिक स्वरुपात लाभ देता येत नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमांतर्गत जेष्ठ नागरिकांना प्रवासी भाड्यात देण्यात येणारी सवलत कमी करण्यात आल्याबाबत

**(४३) ४१८१२ (०२-०८-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमांतर्गत जेष्ठ नागरिकांना प्रवासी भाड्यात यापूर्वी ७५ टक्के सवलत देत असून गत दोन महिन्यापासून ही सवलत ५० टक्के करण्यात आली असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त कारणास्तव जेष्ठ नागरिकांची आर्थिक गैरसोय होत असल्याने प्रवासी भाडे पुर्ववत करण्याबाबतची मागणी जेष्ठ नागरिकांमार्फत करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती आवश्यक कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०९-२०१८) :** (१) नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमांतर्गत जेष्ठ नागरिकांना प्रवाशी भाड्यात यापूर्वी ७५% सवलत देण्यात येत होती.

सद्य:स्थितीत परिवहन उपक्रमास मासिक सरासरी रुपये ३.५ कोटी इतका तोटा होत असल्याने सदरचा तोटा कमी करण्यासाठी महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ, बृहन्मुंबई विद्युत पुरवठा व परिवहन व इतर परिवहन सेवामध्ये जेष्ठ नागरिकांना तिकिटात ५०% सवलत देण्यात येते.

याच धर्तीवर नवी मुंबई महानगरपालिकेने परिवहन उपक्रमामार्फत जेष्ठ नागरिकांना तिकिटात ५०% सवलत देण्याबाबत परिवहन समितीने दिनांक १७/०३/२०१५ रोजीच्या ठराव क्र. २९(क)८ अन्वये व नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेत दिनांक २१/०८/२०१७ रोजीचा ठराव क्र. ५२३ अन्वये मंजूरी देण्यात आलेली आहे.

मुंबई महानगर क्षेत्र परिवहन प्राधिकरणाच्या दिनांक १९.०१.२०१८ रोजीच्या बैठकीतील बाब क्र. ३३ व निर्णय क्र. ३०/२०१८ नुसार उपक्रमाच्या सर्व साधारण बससेवेच्या भाडेवाढीस मंजूरी मिळाली आहे.

त्यानुषंगाने जेष्ठ नागरिकांना दिनांक ०७/०२/२०१८ रोजी पासून तिकिट भाड्यात ७५% ऐवजी ५०% सवलत लागू करण्यात आली आहे.

(२) नवी मुंबई महानगरपालिका परिवहन उपक्रमांतर्गत जेष्ठ नागरिकांनी प्रवासी भाडे पुर्ववत करण्याबाबतची जेष्ठ नागरिकांची तक्रार नवी मुंबई महानगरपालिकेत प्राप्त झालेली नाही.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गुरु गोविंदसिंघजी स्टेडीयम (जि.नांदेड) परीसरातील जिल्हा क्रीडा संकुल वसतिगृहातील अनागोंदी कारभाराबाबत

**(४४) ४२२१८ (०१-०८-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गुरु गोविंदसिंघजी स्टेडीयम (जि.नांदेड) परीसरातील जिल्हा क्रीडा संकुल वसतिगृहात मागील काही दिवसांपासून क्रीडा विभागातील काही अधिकाऱ्यांचा अनागोंदी कारभार सुरु असून त्यांनी क्रीडा संकुलाच्या बाहेरील बाजुने व्यावसायिक गाळे बांधले असून ते भाडेतत्वावर दिल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित अधिकाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२६-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नंदुरबार तालुका क्रीडा संकुलाचे काम सुरु करण्याबाबत

**(४५) ४२६१७ (०१-०८-२०१८). श्री.चंद्रकांत रघुवंशी : तारांकित प्रश्न क्रमांक ३८५०९ ला दिनांक ९ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नंदुरबार तालुका क्रीडा संकुलाच्या भूमिपुजनाच्या कामास सहा ते सात वर्ष पूर्ण होवूनही क्रीडा संकुलाच्या कामास सुरुवात झाली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर क्रीडा संकुलाचे काम किती दिवसात पूर्ण करण्यात येणार आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नंदुरबार तालुका क्रीडा संकुलाचे काम सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२६-०९-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) नंदुरबार तालुका क्रीडा संकुल उभारणीसाठी आदिवासी देवमोगरा एज्युकेशन सोसायटी, नटावद, ता.जि.नंदुरबार संस्थेची जागा संकुल समिती व

संस्था यांच्यात करार करुन प्राप्त करण्याची कार्यवाही चालु होती. परंतु सदर संस्थेने दिनांक २८/०९/२०१७ च्या पत्रान्वये करार रद्द करण्याबाबत जिल्हा क्रीडा अधिकारी, नंदुरबार कार्यालयास कळविले. त्यामुळे संकुलाच्या बांधकामाबाबत दिनांक १४/०२/२०१८ रोजी तालुका क्रीडा संकुल समितीच्या बैठकीचे आयोजन करण्यात आले. सदर बैठकीत तालुका क्रीडा संकुल समिती, नंदुरबारकडे यापूर्वी असलेल्या शहरातील स.क्र. ४२६/अ/१अ या जागेवर इनडोअर हॉल, कार्यालय इमारत व विविध खेळाची मैदाने तयार करणे तसेच अतिक्रमण असलेल्या जागेवर गाळे उभारणी करुन गाळयांच्या मागील बाजूस प्रेक्षागृह तयार करणेबाबतचा निर्णय होऊन सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदुरबार यांचेमार्फत अंदाजपत्रक व आराखडे तयार करुन समितीच्या मान्यतेने संकुलाचे बांधकाम करण्याचे ठरले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील पंचतारांकित हॉटेल ताजने अन्न व औषधी प्रशासन विभागाच्या नियमांचे उल्लंघन केल्याबाबत

**(४६) ४२६६८ (०१-०८-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अन्न व औषध प्रशासन विभागाने पंचतारांकित हॉटेल ताज (कुलाबा, मुंबई) वर टाकलेल्या छाप्यात सदर हॉटेलने अन्न व औषध प्रशासन विभागाच्या नियमांचे उल्लंघन केल्याचे माहे एप्रिल, २०१८ च्या दुस-या आठवडयात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, हॉटेलमध्ये रेस्टॉरंट परवाना नसणे, कामाकरिता अप्रशिक्षित कर्मचारी ठेवणे तसेच अनेक नियमांचे उल्लंघन केल्याचेही निदर्शनास येणे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्‌नुसार संबंधित दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीश बापट (१२-०९-२०१८) :** (१) अन्न व औषध प्रशासन विभागाने दि.२९/१२/२०१७ रोजी ताजमहल पॅलेस कुलाबा, मुंबई या हॉटेलच्या केलेल्या तपासणीमध्ये अन्न सुरक्षा व मानके कायदा २००६ मधील काही तरतुदींचे / नियमांचे उल्लंघन होत असल्याचे निदर्शनास आले आहे.
(२) हॉटेलमध्ये रेस्टॉरन्ट परवाना नसणे, कामाकरीता अप्रशिक्षित कर्मचारी ठेवणे याबाबतच्या नियमांचे उल्लंघन केल्याचे दिसून येत आले नाही.
(३) सदर हॉटेल विरुध्द अन्न सुरक्षा मानके कायदा २००६ मधील कलम ३२ च्या अनुषंगाने आढळलेल्या त्रुटींबाबत सुधारणा नोटीस बजाविण्यात आली होती. सदर सुधारणा नोटीशीच्या अनुषंगाने संबधित हॉटेलकडून झालेल्या नियमांच्या उल्लंघनाबाबत सुधारणा केलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने स्वच्छ भारत अभियानाची जनजागृती करणेकरीता मे.कौटिल्य मल्टीकियेशन प्रा.लि, मुंबई यांची नेमणूक केल्याबाबत

**(४७) ४२९२३ (०२-०८-२०१८). ॲड.अनिल परब : तारांकित प्रश्न क्रमांक ३७६५२ ला दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने स्वच्छ भारत अभियानाची जनजागृती करणेकरीता प्रसिध्दी माध्यम अभिकरण नियुक्त करण्यात येत असून सदर कामाकरीता मे.कौटिल्य मल्टीकियेशन प्रा.लि, मुंबई यांची नेमणूक करून सदर कामाचा कालावधी दिनांक १ जानेवारी, २०१७ ते २ ऑक्टोबर, २०१९ असा निर्धारित करण्यात आलेला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मे.कौटिल्य मल्टीकियेशन प्रा.लि, मुंबई या कंपनीने केलेल्या कामांबाबत महापालिकेने अवलंबलेली मुल्यमापन पध्दती तसेच सदर कामाचे मुल्यमापन करणेकरीता वर्ग १ व २ चा जबाबदार अधिकाऱ्याची नियुक्ती न करताच बिल अदा करण्याकरीता काम केल्याचा दाखला प्रमाणित करणे इत्यादी महत्वाच्या नियमांचे उल्लंघन केलेले असतांनाही सदर कंपनीला वर्क ऑर्डर देण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर कंपनीबरोबर केलेल्या कराराम्यात पथनाटय, महाविद्यालय आणि शाळा, सोसायटया यांच्या स्पर्धा आयोजित करणे व बक्षिस वाटप करणे, वासुदेवाची सुप्रभात फेरी व इतर बाबीचा प्रामुख्याने करण्याबाबत नमुद केलेले असतांना त्याकडे संपूर्णपणे दुर्लक्ष करून सदर कामे केल्याचे भासवून बिले तयार करण्यात आली आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार दोषी कंपनीविरूध्द तसेच संबंधित अधिकारी यांचेवर शासनस्तरावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०९-२०१८)** : (१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेमार्फत स्वच्छ भारत अभियानाची जनजागृती व प्रचार प्रसिध्दी करीता निविदा प्रक्रिया पार पाडून मे.कौटिल्य मल्टीक्रियेशन प्रा.लि. मुंबई यांची दिनांक ०३/११/२०१७ ते दिनांक ०२/११/२०१८ या कालावधीसाठी नेमणूक करण्यात आली आहे, हे खरे आहे.
(२) व (३) कंपनीने केलेल्या कामाच्या मुल्यमापनासाठी व काम करणेचा दाखला प्रमाणिक करण्यासाठी महानगरपालिकेच्या सहाय्यक सार्वजनिक आरोग्य अधिकारी (वर्ग-२) व उपआयुक्त (घनकचरा व्यवस्थापन)(वर्ग-१) यांना प्राधिकृत करण्यात आलेले आहे.

सदर कंपनीचा देकार न्युनतम असल्याने त्यांना स्वच्छ भारत अभियानाची जनजागृती व प्रचार प्रसिध्दी करण्याचे काम देण्यात आलेले आहे. सदर कंपनीकडे पुरेसा कर्मचारी वर्ग आहे.

सद्य:स्थितीत जनजागृती करण्याच्या कामाचे सरासरी २० टक्के काम प्राधिकृत एजन्सीमार्फत करण्यात येत आहे. मात्र एजन्सीने अद्यापपर्यंत देयकाची मागणी केलेली नसल्याने त्यांना देयक अदा करण्यात आले नसल्याचे, कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद महानगरपालिका क्षेत्रातील मराठी माध्यमांच्या सर्व शाळांना निवासी दराने कर लागू करणेबाबत

**(४८) ४३०९७ (०२-०८-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद शहरातील मराठी व उर्दू माध्यमाच्या अनुदानित शाळांना करातून सवलत दयावी या मागणीसाठी औरंगाबाद महानगरपालिका महापौर, उपमहापौर व आयुक्त यांच्या समवेत मा.विधानसभा अध्यक्षांसह शाळांच्या संस्थाचालकांची एक बैठक संपन्न झाली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर बैठकीत संस्थाचालकांनी केलेल्या मागणीचे स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी औरंगाबाद महानगरपालिकेने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) सदर बैठकीत शैक्षणिक संस्थाचालकांनी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम १३२(१) ब अन्वये सामान्य कर माफ करावे अशी मागणी केली आहे.

सदर मागणीच्या अनुषंगाने, औरंगाबाद महानगरपालिकेचे दिनांक ३०/१२/२०१६ च्या कार्यालयीन आदेशान्वये शैक्षणिक संस्थेच्या मालमत्ता कराचा अभ्यास करुन अहवाल सादर करण्यासाठी मुख्य लेखापरिक्षक औरंगाबाद महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली समिती घटीत करण्यात आली.

समितीची बैठक दिनांक ८/१२/२०१७ मध्ये घेण्यात आलेली असून, औरंगाबाद महानगरपालिकेच्या ठराव क्र.५१०/ई दिनांक ७/२/२०१४ अन्वये संमत केलेल्या ठरावानुसार शैक्षणिक संस्थांना करण्यात आलेली कर आकारणी योग्य असून त्यामध्ये कोणताही बदल करता येणार नाही, अशी शिफारस समितीने केली आहे. समितीच्या शिफारशीप्रमाणे कार्यवाही करण्याबाबतचा निर्णय

महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने ठराव क्र. ५१०/ई दिनांक १९/३/२०१८ अन्वये घेतलेला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कुरुळा (ता.कंधार, जि.नांदेड) गावातील नळ योजना बंद असल्याबाबत

**(४९) ४३४५३ (०१-०८-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कुरुळा (ता.कंधार, जि.नांदेड) गावात सन १९९५ पासून सार्वजनिक नळ योजना बंद असून लाखो रुपयांचा खर्च करुनही ही योजना प्रलंबित असल्यामुळे येथील ग्रामस्थांना पाण्यासाठी वणवण करावी लागते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर योजना कार्यान्वित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (२८-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.

कुरुळा गावात एकूण १२ विधंन विहिरीवर विद्युत पंपाद्वारे व टंचाई-२०१३ मध्ये जिल्हा परिषदेकडून झालेल्या पूरक नळ पाणीपुरवठा योजनेतून व गावातील अस्तित्वातील सार्वजनिक विहिरीवरुन गावात पाणीपुरवठा होतो.
(२) कुरुळा हे गाव १३ गावे दैठणा प्रादेशिक पाणीपुरवठा योजनामध्ये समाविष्ट आहे. सदर योजना सन डिसेंबर, २०१३ मध्ये कार्यान्वित करण्यात आली.

मंजूर योजनेनुसार कुरुळा गावात पि.व्ही.सी.वितरण व्यवस्था प्रस्तावित होती जिची लांबी ११.९५ कि.मी. होती. परंतु गावात वितरण व्यवस्थेसाठी पि.व्ही.सी. ऐवजी लोखंडी पाईपलाईन टाकून द्यावी या मागणीसाठी वितरण व्यवस्थेचे काम ग्रामपंचायत पदाधिकारी व ग्रामस्थ यांनी करु दिले नाही.

मंजूर योजनेंतर्गत कुरुळा गावात जलकुंभ, मुख्य संतुलन टाकी बांधून गुरुत्व वाहिनीद्वारे चाचणी घेण्यात आली.

या योजनेचा उद्भव महालिंगी तलाव असल्याने व सततच्या कमी पर्जन्यमान व तलावाच्या वरच्या बाजूस लातूर जिल्हयात नव्याने तलाव बांधल्याने महालिंगी तलावात उपयुक्त पाणी साठा जमा होत नाही. त्यामुळे सदर प्रादेशिक योजना व इतर २ प्रादेशिक योजना तसेच इतर १२ गावे असे ३७ गावांसाठी लिंबोटी (उर्ध्व मानार प्रकल्पात उद्भव) प्रकल्पात उद्भव घेऊन अस्तित्वातील जलशुध्दीकरण केंद्रापर्यंत पाईप लाईनद्वारे पाणी आणण्याचे प्रस्ताव राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम कृती आराखडा सन २०१८-१९ मध्ये प्रस्तावित केले आहे. त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालयातील बदली कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करण्याबाबत

**(५०) ४३५५९ (०१-०८-२०१८). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या दिनांक ७ डिसेंबर, २०१५ शासन निर्णयान्वये शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालयातील ६२६ बदली कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करण्याचा निर्णय घेतला असून सदर निर्णयात सर ज.जी.समूह रूग्णालय, मुंबई या संस्थेतील ३३६ बदली कर्मचाऱ्यांना सरळसेवा भरती प्रक्रियेने दिनांक २६ जानेवारी, २०१६ रोजी शासकीय सेवेत सामावून घेण्यात आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त भरती मागासप्रवर्गातील उमेदवारांना बिंदूनामावलीचे नियम डावलून ज्या बदली कर्मचाऱ्यांची दिनांक ३१ मार्च, २००७ रोजी १० वर्षाची नियमित सेवा झाली अशा कर्मचाऱ्यांची सेवा नियमित करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उर्वरित बदली कामगारांची दिनांक ३१ मे, २०१८ पर्यंत २०-२५ वर्षे सेवा पूर्ण झाली असून त्यांनी सेवेत कायम सामावून घेण्याबाबत शासनाकडे निवेदन/पत्राद्वारे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उर्वरित बदली कामगारांना शासन सेवेत सामावून घेणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२६-१०-२०१८) :** (१) शासनाने ७ डिसेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयातील ६२६ बदली कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित केल्या आहेत. सदर शासन निर्णयात सर ज.जी. समुह रुग्णालये, मुंबई येथील ३३६ बदली कर्मचाऱ्यांचा समावेश आहे.

परंतु सर ज.जी. समुह रुग्णालये, मुंबई येथील ३३६ कर्मचाऱ्यांच्या सेवा सरळसेवा भरती प्रक्रियेने नियमित करण्यात आलेल्या नाहीत.
(२) सर ज.जी. समुह रुग्णालयातील ३३६ बदली कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित झाल्यामुळे त्यांना आरक्षणानुसार नियमित करणे शक्य नव्हते. शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षित प्रवर्गातील ज्या बदली कर्मचाऱ्यांना संबंधित प्रवर्गात पद उपलब्धतेअभावी खुल्या प्रवर्गात सामावून घेण्यात आले आहे. अशा कर्मचाऱ्यांना त्यांच्या मुळ प्रवर्गात रिक्त होणाऱ्या पदावर ज्येष्ठतेनुसार समायोजित करण्यात येत आहे.
(३) हे खरे आहे.
(४) सदर बाब शासनाच्या विचाराधीन आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.